सेवाप्रवेश नियम

मराठी भाषेमधून अधिसूचित करणे.

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक:आरटीआर-1085/1339/प्र.क्र.32/12,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक:- 15 सप्टेंबर, 1994.

## शासन परिपत्रक

शासन सेवेमधील विविध पदांसाठी सेवाप्रवेश नियम जे आजवर केवळ इंग्रजी भाषेमध्ये अधिसूचित करण्यात येत आहेत ते यापुढे मराठी भाषेमध्ये अधिसूचित करणे योग्य होईल किंवा कसे हा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

2. यासंबंधी शासनास असा सल्ला देण्यात आला आहे की, सेवाप्रवेश नियम केवळ मराठी भाषेमध्ये असणे विधीदृष्ट्या योग्य होणार नाही. वैधानिक प्रयोजनांसाठी ते इंग्रजी भाषेत असणे आवश्यक आहे. तथापि इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषांमध्ये सेवाप्रवेश नियम अधिसूचित करण्यास हरकत नाही.

3. शासनाचे राजभाषा विषयक धोरण आणि वर उल्लेखिलेली कायद्याची बाजू यांचा विचार करुन शासन आता असे निर्देशित करीत आहे की, यापुढे नव्याने विहित करावयाचे सेवाप्रवेश नियम अथवा त्यात करावयाची सुधारणा इंग्रजी बरोबरच मराठी भाषेतही अधिसूचित करण्यात यावेत.

4. मराठी भाषांतराच्या कामी एकसूत्रीपणा यावा आणि संदिग्धता टाळावी यादृष्टीने मराठी सेवा प्रवेश नियमांचा तयार करण्यात आलेला आदर्श नमुना सोबत जोडला आहे. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, या आदर्श नमुन्यामधील आवश्यक त्या नियमांचा वापर मराठी भाषेमध्ये सेवाप्रवेश नियम करताना कृपया करावा.

5. सेवाप्रवेश नियमांच्या इंग्रजी प्रारुपाचे मराठी भाषांतर सामान्य प्रशासन विभागाकडून मान्य करुन घेण्याची आवश्यकता नाही. तसेच केवळ इंग्रजी भाषेमध्ये यापूर्वी अधिसूचित झालेल्या विद्यमान सेवाप्रवेश नियमांमध्ये यापुढे करावयाच्या दुरुस्त्या मराठीमधून करण्याची आवश्यकता नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने),
शासनाचे सर्व सचिव,
कार्यासन-20 (सा.प्र.वि.)

---

# अधिसूचना

विभाग.
मंत्रालय, मुंबई-400 032.
दिनांक:-

भारताचे संविधान

क्रमांक                                        भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद 309 खालील परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन (आणि अस्तित्वात असलेले संबंधित सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश अधिक्रमित करुन) _1_ महाराष्ट्राचे राज्यपाल याद्वारे महाराष्ट्र शासनाच्या _2_ विभागाच्या/कार्यालयाच्या अखत्यारीमधील _3_ संचालनालयातील _4_ या पदाच्या सेवा भरतीचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहेत, जसे :-

1. या नियमांना _5_ संचालनालयातील _6_ सेवाप्रवेश नियम, 1986 असे संबोधण्यात यावे.
2. या नियमांमध्ये संदर्भानुसार दुसरा अर्थ अभिप्रेत नसेल तर -
   (अ) "आयोग" म्हणजे महाराष्ट्र लोकसेवा आयोग.
   (ब) "पदवी" म्हणजे संविधिक विद्यापिठाची पदवी.
   (क) 7 विभाग म्हणजे शासनाचा _7_ विभाग.
   (ड) "संचालक" म्हणजे संचालक _8_ महाराष्ट्र राज्य.
   (इ) "संचालनालय" म्हणजे शासनाचे _9_ संचालनालय.
   (फ) "शासन" म्हणजे महाराष्ट्र शासन.
   (ग) "मान्यता प्राप्त संस्था" म्हणजे शासनाने मान्यता दिलेल्या संस्था.
   (ह) "अनुसूचि" म्हणजे या नियमांना जोडलेली अनुसूची.
   (य) "माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा" म्हणजे महाराष्ट्र माध्यमिक शिक्षण मंडळे अधिनियम, 1965 (1965) अन्वये प्रस्थापित केलेल्या विभागीय मंडळाने नियंत्रित केलेली माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा (यामध्ये शासनाने या परीक्षेत समकक्ष म्हणून घोषित केलेल्या इतर परीक्षा अंतर्भूत आहेत.)
   (ज) "मंत्रालयीन विभाग" म्हणजे महाराष्ट्र शासन कार्यनियमावलीच्या अनुसूचि एकमध्ये अंतर्भूत असलेल्या विधी व न्याय विभागातील विधी कक्ष व्यतिरिक्त शासनाचे सर्व विभाग. असे समजण्यात यावे.
3. _10_ विभागाच्या/कार्यालयाच्या अखत्यारीखालील संचालनालयामधील _11_ या पदावरील नेमणुका पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येतील.
   (अ) संचालनालयातील विभाग/कार्यालय यामधील _12_ पदांवर/ _13_ संवर्गात परिविक्षा कालावधीनंतर किमान _14_ वर्षे सेवा पूर्ण केलेल्या _15_ _14_ वर्षापेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा पूर्ण केलेल्या आणि नामनिर्देशनाने सेवा

---

1. जेव्हा/एखादे नियम, आदेश किंवा अनुदेश कार्यान्वित असतील आणि ते अधिक्रमित करावयाचे असल्यास (कंसातील शब्द ठेवावे अथवा खोडावे)
2. या ठिकाणी विभागाचे/कार्यालयाचे नाव नमूद करावे.
3. या ठिकाणी संचालनालयाचे नाव नमूद करावे.
4. या ठिकाणी पदाचे नांव, ते कोणत्या सेवेत व वर्गात आहे, त्याचा उल्लेख करावा.
5. या ठिकाणी संचालनालयाचे नाव नमूद करावे.
6. या ठिकाणी पदाचे नाव, ते कोणत्या सेवेत व वर्गात आहे ते नमूद करावे.
7. या ठिकाणी संबंधित विभागाचे नाव नमूद करावे.
8. या ठिकाणी संचालक पदाचे पूर्ण पदनाम नमूद करावे.
9. या ठिकाणी संबंधित संचालनालयाचे नाव नमूद करावे.
10. या ठिकाणी विभागाचे नाव नमूद करावे.
11. या ठिकाणी पदाचे नाव नमूद करावे.
12. या ठिकाणी पदाचे नाव नमूद करावे.

एच-671(अ)(1000-8-98)2

13. या ठिकाणी ज्या संवर्गामधून पदोन्नती द्यावयाची आहे तो संवर्ग नमूद करावा.

14. या ठिकाणी पदोन्नतीसाठी किती वर्ष सेवा आवश्यक आहे. ते नमूद करावे.

15. या ठिकाणी ज्या पदावरील अनुभव अपेक्षित आहे त्या पदाचे नाव नमूद करावे.

16. या ठिकाणी ज्या सेवेमधून, संवर्गामधून बदलीने नियुक्ती करणे अभिप्रेत आहे, त्या सेवे/संवर्गाचे नाव नमूद करावे.

17. या ठिकाणी जी अर्हता अभिप्रेत आहे ती अर्हता नमूद करावी.

18. या ठिकाणी लष्करी सेवेतील जो हुद्दा अपेक्षित आहे तो नमूद करावा.

19. या ठिकाणी अपेक्षित असलेला कालावधी नमूद करावा.

20. या ठिकाणी जी वयोमर्यादा अभिप्रेत आहे, ती नमूद करावी.

21. या ठिकाणी कोणती श्रेणी आवश्यक आहे ते नमूद करावे.

22. या ठिकाणी कोणत्या विषयाची पदवी अभिप्रेत आहे तो विषय नमूद करावा.

23. या ठिकाणी कोणती परीक्षा अभिप्रेत आहे ते नमूद करावे.

24. या ठिकाणी कोणत्या वर्गातील परीक्षा उत्तीर्ण असले पाहिजे ते नमूद करावे.

25. या ठिकाणी कोणत्या व्यवसायामधील पदविका अभिप्रेत आहे ते नमूद करावे.

26. या ठिकाणी किती वर्षाचा अनुभव आवश्यक आहे तो नमूद करावा.

**प्रवेशासाठी विहित केलेल्या उपबंध ( ) मधील शैक्षणिक अर्हता/अनुभव धारण** करणा-या व्यक्तीमधून गुणवत्ता निवड/ज्येष्ठता अधिन पात्रता या आधारावर पात्र ठरविलेल्या व्यक्तींच्या पदोन्नतीने, किंवा

(ब) 16 या सेवेमध्ये/संवर्गात काम करीत असलेल्या आणि 17 ही अर्हता धारण करीत असलेल्या योग्य व्यक्तीच्या बदलीने/प्रतिनियुक्तीद्वारे बदलीने, किंवा

(क) भारत शासन/अन्य राज्य शासन/अन्य स्थानिक प्राधिकरण/संविधिक महामंडळ यांच्या सेवेत असलेल्या आणि 17 ही अर्हता धारण करीत असलेल्या व्यक्तीच्या प्रतिनियुक्तीने, किंवा

(ड) जी व्यक्ती केंद्र शासनाच्या सशस्त्र दलातील सेवेमधून मुक्त झाली आहे आणि जी 18 किंवा समकक्ष दर्जाच्या हुद्द्यावर काम करीत होती आणि या नियमाच्या खंड ( ) च्या उपखंड ( ) मधील अर्हता धारण करीत आहे अशा योग्य व्यक्तीच्या पुनर्नियुक्तीने. मात्र अशा व्यक्तीने संरक्षण सेवेतून निवृत्त होऊन किंवा सेवामुक्त होऊन 19 वर्षांचा कालावधी लोटलेला असता कामा नये, किंवा

(इ) पुढील अटी पूर्ण करणा-या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,

(1) अगोदरच शासन सेवेत असलेल्या उमेदवारांखेरीज करुन ज्यांचे वय 20 वर्षापेक्षा जास्त नाही.

(2) जो संविधिक विद्यापीठाच्या कला/विज्ञान/वाणिज्य/विधी शाखेतील 21 श्रेणीत/ 22 विषयासह पदवी/स्नातकोत्तर पदवी/डॉक्टरेट पदवी/धारण करीत आहे, किंवा

(1) जो 23 ही परीक्षा 24 वर्गात उत्तीर्ण झाला आहे, किंवा

(2) जो कोणत्याही मान्यता प्राप्त संस्थेची 25 मधील पदविका/किंवा शासनाने तिच्याशी समकक्ष ठरविली आहे अशी अर्हता धारण करीत आहे, आणि

(3) ज्याने वरील उपखंड ( ) मध्ये नमूद केलेली अर्हता संपादन केल्यानंतर एखाद्या उद्योगामधील/एखाद्या शासकीय खात्यामधील शासनाने स्थापित केलेल्या औद्योगिक उपक्रमामधील किंवा व्यापारी संस्थेतील/स्थानिक प्राधिकरणात/महामंडळात जबाबदारीच्या पदावर व्यावहारिक अनुभव किंवा सर्वमान्य गुणवत्तेसह संशोधनाचा किमान 26 वर्षे इतका अनुभव मिळविलेला आहे

एच-671(अ)(1000-8-98)2अ

(अ) ज्याला 27 या सखोल/कामचलाऊ/पुरेसे ज्ञान आहे.

(ब) ज्याच्याकडे 28 या कामाची आखणी व देखरेख करण्याची क्षमता आहे.

परंतु ज्या उमेदवाराकडे असाधारण शैक्षणिक अर्हता/ किंवा अनुभव/किंवा दोन्ही असतील अशा उमेदवारांच्या बाबतीत जर आयोगाने/निवड प्राधिका-यांच्या शिफारशीवरुन नियुक्ती प्राधिका-याने, शिफारस केली तर, शासन प्रसंगी कमाल वयोमर्यादा/अनुभव कालावधी शिथील करु शकेल.

आणखी तरतूद करण्यात येते की, जे उमेदवार 29 ही अर्हता धारण करीत आहेत/किंवा त्यांचेजवळ असाधारण शैक्षणिक अर्हता/अनुभव आहे, अशा उमेदवारांना पसंतीक्रम देता येईल.

पुढे/आणखी अशी तरतूद करण्यात येते की, विहित कालावधीचा अनुभव असणारे उमेदवार पुरेशा संख्येत जर उपलब्ध नसतील तर, त्यापेक्षा कमी अनुभव असणा-या उमेदवारांचा देखील विचार करता येईल.

4. नियम 30 च्या खंड ( ) च्या उपखंड ( ) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी निवडीच्या कोणत्याही टप्प्याला अनुसूचित जाती, बौध्द धर्मांतरीत, अनुसूचित जमाती, विमुक्त किंवा भटक्या जमातीकरिता राखून ठेवलेली रिक्त पदे भरण्याकरिता मूलभूत उच्चस्तर शैक्षणिक अर्हता/अनुभव धारण करणारे पुरेसे उमेदवार उपलब्ध नाहीत असे जर आयोगाचे/निवड प्राधिकरणाचे मत झाले तर आयोगाला/निवड प्राधिकरणाला अशा निवडीच्या बाबतीत पदवी, पदविका किंवा इतर परीक्षा यामधील उच्चस्तर वर्ग/अनुभव कालावधी याबाबतची किंवा या दोन्हींमधील अट प्रसंगी शिथील करता येईल. आणि या जाती/जमातीचे मात्र उमेदवाराची पदांकरिता निवड करता येइल.

5. पदोन्नती व नामनिर्देशन या मार्गांनी करावयाच्या नेमणुका 31 या प्रमाणांत करता येतील, किंवा

बदलीने नियुक्ती/प्रतिनियुक्तीने बदली/प्रतिनियुक्ती या मार्गांनी जी पदे भरण्यात येणार नाहीत अशा पदांवर पदोन्नती आणि नामनिर्देशन या मार्गांनी 31 या प्रमाणात नेमणुका होतील, किंवा नामनिर्देशनाने भरावयाच्या पदांची संख्या 32 पदांच्या एकूण संख्येच्या 33 टक्क्यापेक्षा अधिक असणार नाही.

6. नामनिर्देशनाने नेमणूक केलेली व्यक्ती 34 वर्षाच्या परिविक्षा कालावधीवर राहील.

7. पदोन्नती/बदलीने नियुक्ती/किंवा नामनिर्देशन यापैकी कोणत्याही मार्गाने नेमणूक झालेल्या व्यक्तीला जर ती अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर विभागीय परीक्षा आणि/हिंदी व मराठी भाषा परीक्षा त्यासंबंधी केलेल्या नियमांनुसार उत्तीर्ण व्हाव्या लागतील.

27. या ठिकाणी कोणत्या विषयाचे ज्ञान आवश्यक आहे ते नमूद करावे.

28. या ठिकाणी कोणत्या कामाची आवश्यकता आहे ते नमूद करावे.

29. या ठिकाणी कोणती अर्हता पसंती क्रमाची राहील हे नमूद करावे.

30. या ठिकाणी कोणत्या नियमांखालील अर्हता शिथीलक्षम राहिला त्याचा क्रमांक नमूद करावा.

31. या ठिकाणी किती प्रमाण अभिप्रेत आहे ते नमूद करावे.

32. या ठिकाणी ज्या पदावर भरती करावयाची आहे त्या पदाचे नाव नमूद करावे.

33. या ठिकाणी प्रमाण काय राहिले ते नमूद करावे.

34. या ठिकाणी वर्ष संख्या नमूद करावी.

8. पदावर नेमणूक केलेल्या व्यक्तीस जर आवश्यकता वाटली तर कोणत्याही भारतीय संरक्षण सेवेमध्ये किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या पदावर भारतात किंवा भारताबाहेर चार वर्षे/चार वर्षापेक्षा कमी नाही इतक्या कालावधीसाठी. (प्रशिक्षणासाठी घालविलेला कालावधी जमेस धरुन) वेळोवेळी केंद्र शासनाने विहित केलेल्या अटींनुसार सेवा करावी लागेल.

9. पदावर नियुक्ती केलेली व्यक्ती महाराष्ट्र राज्यात कोठेही/किंवा 35 या संवर्गात/सेवेत बदली होण्यास पात्र राहील.

35. या ठिकाणी संवर्गाचे नाव नमूद करावे.

10. नेमणुकीसाठी निवडलेल्या वैद्यकीय पदवीधर उमेदवारास जर त्याचे नाव महाराष्ट्र वैद्यकीय परिषद अधिनियम, 1965 खाली नोंदणी झाले नसेल किंवा त्याचे नाव भारतीय वैद्यकीय परिषद अधिनियम 1956 खाली ठेवण्यात येणा-या नोंदणी पटलावर अंतर्भूत झाले नसेल, तर आपले नाव नियुक्तीपूर्वी त्याप्रमाणे नोंद करुन घेणे आवश्यक राहील.

11. उपरोक्त नियमांमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी सेवेची निकड लक्षात घेऊन जेव्हा आवश्यक असेल तेव्हा 36 पदावर नामनिर्देशनाने भरती करण्याचे जे प्रमाण विहित केले आहे ते प्रमाण शिथिल करावे असे शासनाच्या मते आवश्यक वाटल्यास ते प्रमाण आयोगाच्या विचारविनिमयाने शिथिल करुन शासनास नेमणुका करता येतील.

36. या ठिकाणी ज्या पदावर भरती करावयाची आहे त्या पदाचे नाव नमूद करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शासनाचे सचिव.